रुपी को-ऑप. बँकेस "विशेष एकरकमी कर्ज परतफेड योजना" मंजूर करण्याबाबत .

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: युआरबी-१८१४/प्र.क्र.३३१/७-स,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक :- ०५ सप्टेंबर, २०१५.

वाचा :- १) शासन निर्णय क्र. युआरबी-१८१४/प्र.क्र.३३१/७-स दि. ०८.०७.२०१५.
२)सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे दि.२१.०८.२०१५ चे पत्र.
३) भारतीय रिझर्व बँकेचे क्र. DCBR.CO.AID/D-१०/१२.२२.२१८/२०१५-१६, दि.२०.८.२०१५ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

रुपी को-ऑप. बँक लि., पुणे या बँकेस "विशेष एकरकमी कर्ज परतफेड योजना" मंजूर करण्याबाबत सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी दि.२१.०८.२०१५ रोजी शासनास प्रस्ताव सादर केला आहे. शासनाने संदर्भ क्र. १ मधील शासन निर्णयाद्वारे या बँकेस मंजूर केलेल्या एकरकमी कर्ज परतफेड योजनेची मुदत दि.२१.०८.२०१५ अखेर पूर्ण झाली आहे. भारतीय रिझर्व्ह बँकेने दि.२०.०८.२०१५ च्या पत्राद्वारे रुपी बँकेवरील निर्बंधाची मुदत दि. २१.०२.२०१६ पर्यंत वाढवून दिली आहे.

बँकेच्या ठेवीदारांची संख्या सुमारे ६.२२ लाख ऐवढी असून ठेवीची रक्कम सुमारे रु.१५१६ कोटी आहे. सदर बँकेचे अन्य बँकेत विलीनीकरण करण्याच्या दृष्टीने बँकेच्या स्तरावर प्रयत्न सुरु आहेत. वरीलप्रमाणे सदर बँकेसाठी एकरकमी कर्ज परतफेड योजना मंजूर केल्यास थकीत कर्जाची वसुली होऊन बँकेचा संचित तोटा कमी झाल्यास या बँकेचे अन्य बँकेत विलीनीकरण सुलभ होणार आहे. बँकेचे सभासद व ठेवीदारांचे हित लक्षात घेऊन या बँकेसाठी विशेष एकरकमी कर्ज परतफेड योजना मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी दि. २१.०८.२०१५ च्या पत्राद्वारे रुपी को-ऑप. बँक लि., पुणे या बँकेसंदर्भात सादर केलेल्या विशेष एकरकमी कर्ज परतफेड योजनेस महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मधील कलम १५७ मधील तरतूदीनुसार शासनास प्राप्त असलेल्या अधिकारानुसार महाराष्ट्र सहकारी संस्था नियम, १९६१ मधील नियम ४९ च्या तरतुदीमधून सूट देऊन रुपी को-ऑप. बँक लि., पुणे या बँकेच्या विशेष एकरकमी कर्ज परतफेड योजनेस दिनांक २१.०२.२०१६ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

वरील योजनेच्या अंमलबजावणीचा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी दरमहा आढावा घेऊन भारतीय रिझर्व्ह बँकेच्या अटींचे रुपी को-ऑप. बँकेकडून काटेकोरपणे पालन होत असल्याची खात्री करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०९०५१४५२०७३३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Santosh Arun Patil

Digitally signed by Santosh Arun Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Officer On Special Duty, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=e52439642ab57c332b2a3e3e46f0d907ba6167409ef6d52c943bf775ecf042fd, cn=Santosh Arun Patil
Date: 2015.09.09 15:21:09 +05'30'

**(संतोष पाटील)**
विशेष कार्य अधिकारी

**प्रत** :-

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) प्रशासक, रुपी को. ऑप. बँक लि. पुणे.
३) महाप्रबंधक, भारतीय रिझर्व्ह बँक, गारमेंन्ट हाऊस, डॉ. ए.बी.रोड, वरळी, मुंबई.